सन २०२१-२२ या आर्थिक वर्षाकरीता इको टास्क फोर्स बटालियन (२४०६ A२११) लेखाशीर्षांतर्गत अनुदान वितरण करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**

**महसूल व वन विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः साववि-२०२१/प्र.क्र.१४/फ-११**

मंत्रालय, मुंबई-४०० ०३२

दिनांक : ३१ मार्च, २०२२

**वाचा**:-

१) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र. अर्थसं -२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३, दि.६.०४.२०२१

२) वित्त विभाग, शासन निर्णय क्र. अर्थसं -२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३, दि.२४.०६.२०२१

३) प्रधान मुख्य वन संरक्षक ( अर्थसंकल्प, नियोजन व विकास ), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे क्रमांक कक्ष-१/ पी/यो/चाबाप्र/ प्र.क्र. ५७/(१९-२०)/१६३/२०-२१, दि. २.०८.२०२१.

४) प्रधान मुख्य वन संरक्षक ( अर्थसंकल्प, नियोजन व विकास ), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे क्रमांक कक्ष-१/ पी/यो/अ.स./ प्र.क्र. ०९/२०२१-२२, दि. ६.०८.२०२१.

५) शासन निर्णय क्रमांक साववि-२०२१/प्र.क्र.१४/फ-११, दि. ९.०८.२०२१.

६) वित्त विभाग, शासन निर्णय क्र. अर्थसं-२०२१/प्र.क.४८/अर्थ-३, दि. १४.१०.२०२१.

७) शासन निर्णय क्रमांक साववि-२०२१/प्र.क्र.१४/फ-११, दि. १५.१२.२०२१.

८) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०२१/प्र.क.४८/अर्थ-३, दि. २८.०१.२०२२.

९) प्रधान मुख्य वन संरक्षक ( अर्थसंकल्प, नियोजन व विकास ), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे क्रमांक कक्ष-१/ पी/यो/अ.स./ प्र.क्र. १७/२०२१-२२/७१३, दि. २९.०३.२०२२

**प्रस्तावना**:-

मराठवाडा महसूल विभागात केवळ ४.८२ क्षेत्रावर वृक्षाच्छादन आहे. त्यामुळे या विभागातील वृक्षाच्छादन वाढविणे आवश्यक आहे. तथापि, वृक्ष लागवडीसाठी येथील परिस्थिती प्रतिकुल असल्याने इको टास्क फोर्स बटालियनची मदत घेण्याबाबतचा निर्णय सन २०१६ मध्ये घेण्यात आलेला आहे. त्यानुसार दि. १३.१०.२०१६ रोजीच्या शासन निर्णयानुसार एक कंपनी जुलै, २०१७ मध्ये स्थापन करण्यात आली आहे. इको टास्क फोर्स बटालियनमध्ये ४ अधिकारी, ५ जेसीओ आणि १३९ इतर कर्मचारी असतात. इको टास्क फोर्स बटालियनमध्ये सेवानिवृत्त झालेले लष्करी अधिकारी/जवान ज्यांचे वय ४५ वर्षापेक्षा कमी व सेवानिवृत्त होऊन पाच वर्षापेक्षा कमी कालावधी झालेला आहे, असे लष्करी अधिकारी/जवान कार्यरत असतात. सदर अधिकारी/कर्मचारी नियुक्तीपासून ते वयाच्या ५५ वर्षापर्यंत कार्यरत राहतात.

२. सन २०२१-२२ या आर्थिक वर्षात शासनाच्या महत्वाकांक्षी वृक्ष लागवडीच्या प्रकल्पासाठी इको टास्क फोर्स बटालियनच्या माध्यमातून ४५ हेक्टर क्षेत्रावर लागवड पूर्व कामे करणे, ४५ हेक्टर क्षेत्रावर प्रथम वर्षीय कामे, १२७ हेक्टर क्षेत्रावर द्वितीय वर्षीय कामे, १६५ हेक्टर क्षेत्रावर तृतीय वर्षीय रोपवन कामे,

१२५ हेक्टर क्षेत्रावर चतुर्थ वर्षीय कामे व ६५ हेक्टर क्षेत्रावर पंचम वर्षीय रोपवन कामे तसेच इको टास्क फोर्स बटालीयनच्या सदस्यांकरिता सोई सुविधा, त्यांचे वेतन व भत्ते इत्यादी करण्याचे प्रस्तावित आहे. येणाऱ्या **"इको टास्क फोर्स बटालियन (२४०६ A२११)"** या योजनेंतर्गत सन २०२१-२२ करिता ५०-इतर खर्च अंतर्गत या उदिष्टांतर्गत रू. १५००.०० लक्ष इतका नियतव्यय अर्थसंकल्पीत करण्यात आलेला आहे.

३. इको टास्क फोर्स बटालियन (२४०६ A२११) या योजनेंतर्गत सन २०२१-२२ या आर्थिक वर्षात अर्थसंकल्पित निधी व वित्त विभागाने सुधारित अंदाजानुसार वितरणासाठी उपलब्ध केलेल्या निधीची माहिती खालीलप्रमाणे आहे.

| **योजनेचे नाव** | **सन करिता २२-२०२१ अर्थसंकल्पीय निधी (रु. लक्ष)** | | **सन २०२१-२२ करिता सुधारित अंदाजानुसार उपलब्ध निधी (RE) (रु. लक्ष)** | |
|---|---|---|---|---|
| इको टास्क फोर्स बटालियन २४०६ A२११ | ५० -इतर खर्च | १५००.०० | ५० -इतर खर्च | १०००.०० |
| | **एकूण** | **१५००.००** | **एकूण** | **१०००.००** |

सन २०२१-२२ या आर्थिक वर्षात इको टास्क फोर्स बटालियन (२४०६ A२११) या योजनेंतर्गत ५०-इतर खर्च या उद्दिष्टांतर्गत या विभागामार्फत खालील शासन निर्णयांन्वये निधी वितरीत करण्यात आलेला आहे.

**(रू. लाखात)**

| **योजनेचे नाव** | **शासन निर्णयांन्वये वितरित करण्यात आलेला निधी** | | |
|---|---|---|---|
| | **५०- इतर खर्च** | | |
| | दि. ९.०८.२१ | दि. १५.१२.२१ | दि. ९.०२.२२ |
| इको टास्क फोर्स बटालियन २४०६ A२११ | १५०.०० | ६००.०० | १५०.०० |
| **एकूण** | **९००.००** | | |

४. इको टास्क फोर्स बटालियन (२४०६ A२११) या योजनेंतर्गत सन २०२१-२२ या आर्थिक वर्षात वित्त विभागाने सुधारित अंदाजानुसार उपलब्ध करुन दिलेला निधी आणि या विभागाने वितरीत केलेला निधी विचारात घेता शिल्लक निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन निर्णय :-</u>**

सन २०२१-२२ या आर्थिक वर्षात इको टास्क फोर्स बटालियन (२४०६ A२११) या योजनेंतर्गत या विभागामार्फत वितरीत करण्यात आलेला निधी व सुधारित अंदाजानुसार शिल्लक निधी पुढीलप्रमाणे आहे.

(रु. लाखात)

| **योजनेचे नाव** | **सुधारित अंदाजानुसार उपलब्ध निधी (R E)** | **शासन निर्णयांन्वये वितरित करण्यात आलेला निधी** | | | | **सन २०२१-२२ करिता शिल्लक निधी** |
|---|---|---|---|---|---|---|
| इको टास्क फोर्स बटालियन २४०६ A२११ | **५० -इतर खर्च** | **५० -इतर खर्च** | | | **एकूण एकंदर** | **५० -इतर खर्च** |
| | | दि. ९.०८.२१ | दि. १५.१२.२१ | दि. ९.०२.२२ | | |
| | १०००.०० | १५०.०० | ६००.०० | १५०.०० | ९००.०० | १००.०० |

२. त्यानुसार इको टास्क फोर्स बटालियन (२४०६ A२११) या लेखाशिर्षाखाली सुधारित अंदाजानुसार शिल्लक असलेल्या निधीपैकी ५०-इतर खर्च या उद्दिष्टांतर्गत रु. १००.०० लक्ष निधी वितरीत करण्यास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे.

३. सदर निधीसाठी नियंत्रक अधिकारी म्हणून प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांच्याकडे सुपूर्त करण्यात येत आहे. या योजनेंतर्गत घ्यावयाच्या कामाची अंमलबजावणी कृती आराखड्याप्रमाणे, विहित कार्यपध्दतीनुसार आणि ठरविलेल्या मुदतीत करण्याबाबत दक्षता घ्यावी. याबाबत सविस्तर मार्गदर्शक सूचना क्षेत्रीय अधिकाऱ्यांना द्याव्यात आणि अंमलबजावणीबाबत वेळोवेळी आढावा घ्यावा. सदर निधी मंजूर असलेल्या योजनांवरच खर्च करण्यात यावा. मंजूर निधीपेक्षा जास्त खर्च होणार नाही याची नियंत्रक अधिकाऱ्यांनी दक्षता घ्यावी. सदर योजनेतंर्गत प्रस्तावित कामांना तांत्रिक व प्रशासकीय मंजूरी देण्यात आली असल्याची खात्री करूनच निधी वितरित करण्यात यावा.

४. प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), हे वर्ष २०२१-२२ मध्ये सदर योजनेंतर्गत वितरीत केलेल्या निधीबाबत उपयोगिता प्रमाणपत्र ७ दिवसांत शासनास सादर करतील.

५. सदर निधी वितरित करण्यापूवी प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी सदर योजनेसाठी सन २०२१-२२ करिता वितरित केलेला निधी अर्थसंकल्पीय वितरण प्रणाली व्यतिरिक्त अन्यत्र ठिकाणी वळता केला नसल्याची खात्री करावी.

६. सदर निधी खर्च करताना वित्त विभागाच्या संदर्भ क्रमांक १, २ व ८ येथील शासन परिपत्रक/ निर्णयातील तरतूदी व महाराष्ट्र अर्थसंकल्पीय नियम पुस्तिका, वित्तीय अधिकार नियम पुस्तिका यामध्ये उल्लेख केलेल्या तरतुदींनुसार व वेळोवेळी दिलेल्या सूचनांचे पालन करण्यात यावे.

७. जिल्हानिहाय वितरीत तरतुदीची माहिती व राबविण्यात आलेल्या कार्यक्रमाची/झालेल्या खर्चाचा तपशील शासनास दरमहा विहित प्रपत्रात सादर करण्यात यावा. तसेच योजनेचे संनियंत्रण प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांच्यामार्फत व्हावे.

८. सदर योजने अंतर्गत होणारा खर्च खाली नमूद केलेल्या लेखाशीर्षाखाली सन २०२१-२२ च्या मंजूर अर्थसंकल्पीत निधीतून खर्ची टाकण्यात यावा.

**मागणी क्र. सी-०७**
**२४०६, वनीकरण व वन्यजीवन (राज्य) योजनांतर्गत योजना**
**११० वन्य जीव संरक्षण**
**इको टास्क फोर्स बटालियन (००)(२६) (२४०६ A२११)**
**५०- इतर खर्च**

९. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र. अनौ./१४२/व्यय-१० दि. ३१.०३.२०२२ अन्वये प्राप्त सहमतीनूसार निर्गमित करण्यात येत आहे.

१०. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२२०३३१२११४२७२५१९ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने

RAVIKIRAN SABAJI GOVEKAR

Digitally signed by RAVIKIRAN SABAJI GOVEKAR
DN: c=IN, o=Personal,
pseudonym=bb348b74c34d5cdc104457bb077cbbab2753fda99613688793f8ffb2d4595af5,
2.5.4.20=d399ba42648ff6007bc88b201ae47aa7d8a80a09e22cffd4c08887e4e01ce080, postalCode=416519, st=MAHARASHTRA,
serialNumber=b752370b557d0a3e58b4b069230bc54f6a13d04798d2ee7a3f1c7dcc5655271c, cn=RAVIKIRAN SABAJI GOVEKAR
Date: 2022.03.31 21:17:38 +05'30'

**( डॉ. रविकिरण गोवेकर )**
**मुख्य वनसंरक्षक (मंत्रालय)**

**प्रत,**

१. प्रधान मुख्य वनसंरक्षक, (वनबल प्रमुख),महाराष्ट्र राज्य, नागपूर.
२. प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
३. प्रधान मुख्य वनसंरक्षक, सामाजिक वनीकरण , महाराष्ट्र राज्य, पुणे.
४. मुख्य वनसंरक्षक/ वनसंरक्षक ( प्रादेशिक ) (११ वृत्त )
५. वनसरंक्षक , सामाजिक वनीकरण ( ६ वृत्त )
६. उप वनसंरक्षक (प्रा) (सर्व)/ विभागीय वन अधिकारी (प्रा)/ उपविभागीय वन अधिकारी (प्रा)
७. विभागीय वन अधिकारी,सामाजिक वनीकरण ( सर्व जिल्हे )
८. महालेखापाल, (लेखापरीक्षा/लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१ व २ , मुंबई व नागपूर,
९. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,
१०. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई ४०० ०३२.
११. निवासी परिक्षा लेखा अधिकारी,मुंबई
१२. वित्त विभाग,व्यय-१०,अर्थसंकल्प-०६ मंत्रालय, मुंबई-३२

१३. कार्यासन अधिकारी, फ-२,महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२

१४. कार्यासन अधिकारी, ब-१,महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२

१५. उप सचिव/अवर सचिव(सर्व), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२

१६.निवडनस्ती फ-११.